पु.ल. देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी,मुंबई येथे
दिनांक ०८ मार्च ते १२ ,२०२३ या कालावधीत
आयोजित करण्यात येणा-या “महिला महोत्सव २०२३”
च्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणेबाबत.



**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- पुलदे-२०२२/प्र.क्र.२३/सां.का. २**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक : ०३ मार्च, २०२३.

वाचा :- प्रकल्प संचालक, पु.ल. देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी यांचे पत्र क्र- पुलदे/२३०५, दि. १४.०२.२०२३

**शासन निर्णय :-**

पु.ल. देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांचेमार्फत दि. ०८.०३.२०२३ ते दि. १२.०३.२०२३ या कालावधीत विविध कलाविष्कारांवर आधारीत “महिला महोत्सव २०२३" चे आयोजन करण्याबाबत प्रस्तावित करण्यात आले आहे. अकादमीच्या प्रस्तावानुसार **दि. ०८.०३.२०२३ ते दि. १२.०३.२०२३ या कालावधीत पु.ल. देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई येथे "महिला महोत्सव २०२३”** चे आयोजन करण्यास व सदर महोत्सवांतर्गत होणाऱ्या विविध कार्यक्रमासाठी खालील तक्यात नमूद बाबींकरीता येणाऱ्या रु.२०,००,०००/- (अक्षरी रुपये वीस लाख फक्त) इतक्या अपेक्षित खर्चास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय व वित्तीय मंजूरी देण्यात येत आहे.खालील तक्त्यातील बाबअंतर्गत १५% पर्यंत फेरवाटप करता येईल.

| अ.क्र. | बाबनिहाय तपशील | अपेक्षित खर्चाची रक्कम |
|---|---|---|
| १ | सांस्कृतिक कार्यक्रम कलावंत, समन्वयन मानधन | रू.१३,००,०००/- |
| २ | उदघाटन व इतर खर्च | रू.५०,०००/- |
| ३ | प्रकाश व्यवस्था | रू.८०,०००/- |
| ४ | रंगमंच/नेपथ्य व्यवस्था | रू.६०,०००/- |
| ५ | जाहीरात | रू.२,००,०००/- |
| ६ | छायाचित्रण (Photography)<br>चित्रीकरण शूटींग (Shooting) | रू.१,००,०००/- |
| ७ | छपाई व डिझाईन वर्क | रू.७०,०००/- |
| ८ | ध्वनी व्यवस्था | रू.१,००,०००/- |
| ९ | लाईव्ह स्क्रिनिंग | रू.४०,०००/- |
| | **एकूण अपेक्षित खर्च** | **रू.२०,००,०००/-** |

२. सदर कार्यक्रमासाठी होणा-या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र प्रकल्प संचालक, पु.ल. देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांनी तात्काळ शासनास सादर करावे.

३. प्रकल्प संचालक, पु.ल. देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांना यासाठी नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिका-यास यासंबंधीच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

४. यासाठी होणारा खर्च मागणी क्रमांक " झेडडी-२२०५ कला व संस्कृती (०७) कला अकादमी (०७) (०१) पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई (अनिवार्य) (२२०५ १४६३) ५०- इतर खर्च" या लेखाशीर्षाखाली सन २०२२-२३ या वित्तीय वर्षातील मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र. २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग दोन, दिनांक १७ एप्रिल, २०१५ वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला , उप विभाग तीन, अ.क्र. ४. नियम २७ (२) (अ) नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराच्या अधिन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

६. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२३०३०३१८४९४१७२२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUMANT
DINKAR PASHTE

Digitally signed by SUMANT DINKAR PASHTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=58694d4cd2bd16f0ab6514fc8598a9aa217e2508455856a701adb1bb6ef9b120, pseudonym=565ADED7321B71A5B0327BA1F7149AED1F618E4E, serialNumber=AFC006DAAE95D0F2CF7C7F09CA18CF0C9C9363A05E6070B1C03455CF1CB43586, cn=SUMANT DINKAR PASHTE
Date: 2023.03.03 18:56:34 +05'30'

**( सु. दि. पाष्टे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत:-** १. प्रकल्प संचालक, पु.ल. देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, प्रभादेवी, मुंबई,
२.महालेखापाल, महाराष्ट्र-२/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) मुंबई/नागपूर
३.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
५. उप सचिव (व्यय-१५), वित्त विभाग मंत्रालय, मुंबई.
६. अवर सचिव (अर्थसं.) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई...
७.निवड नस्ती, सां. का. २.